**प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत**
कार्यकारी अभियंता बांधकाम विभाग जिल्हा परिषद ठाणे यांचे इमारतीच्या टेरेस वर अधिक्षक अभियंता (प्रमंग्रासयो) कोकण विभाग व कार्यकारी अभियंता (म.ग्रा.र.वि.स.) यांचे कार्यालयासाठी आवश्यक बांधकाम, नविन फर्निचर व अंतर्गत सोईसुविधासाठीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्र. ग्रासयो-२०११/प्र.क्र.२५०/यो-०८**
**मंत्रालय,मुंबई-३२**
**दिनांक २३सप्टेंबर, २०११**

**संदर्भ** -१) अधिक्षक अभियंता महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) कोकण विभाग ठाणे यांचे पत्र क्र.अअ/प्रमंग्रासयो/मग्रारविस/कोवि/४६५, दि. ०९ ऑगस्ट २०११.

**प्रस्तावना :-**

अधिक्षक अभियंता , महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,(प्रमंग्रासयो), कोकण विभाग ठाणे यांनी कार्यकारी अभियंता महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था जिल्हा ठाणे व अधिक्षक अभियंता (प्रमंग्रासयो), कोकण विभाग यांचे कार्यालयासाठी कार्यकारी अभियंता बांधकाम विभाग जिल्हा परिषद ठाणे यांचे इमारतीच्या टेरेस वर कार्यालयासाठी आवश्यक बांधकाम, नविन फर्निचर व अंतर्गत सोईसुविधासाठीच्या लागणा-या रु. ११,५७,०००/- च्या प्रस्तावास मान्यता मिळण्याची शिफारस सदर्भीय पत्र क्र.१ अन्वये केली आहे.

सदर प्रस्तावाची छाननी अधिक्षक अभियंता , महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,(प्रमंग्रासयो), कोकण विभाग ठाणे यांचे मार्फत करण्यात आली आहे.त्यानुसार कार्यालयीन इमारतीच्या आवश्यक बांधकाम, नविन फर्निचर व अंतर्गत सोईसुविधासाठीच्या लागणा-या रु. ११.५७लक्ष इतक्या रकमेची मागणी करण्यात आली आहे.

त्यानुसार अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,(प्रमंग्रासयो),विभाग टाणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मंत्री ग्राम सडक योजनेअंतर्गत कार्यकारी अभियंता बांधकाम विभाग जिल्हा परिषद ठाणे यांचे इमारतीच्या टेरेस वर अधिक्षक अभियंता (प्रमंग्रासयो) कोकण विभाग व कार्यकारी अभियंता (म.ग्रा.र.वि.स.) यांचे कार्यालयासाठी आवश्यक बांधकाम, नविन फर्निचर व अंतर्गत सोईसुविधासाठीच्या रू.११.५७ लक्ष (रु. अकरा लक्ष अकरा लक्ष सत्तावण हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय प्रस्तावास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयाअन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(१) कार्यालयाच्या वापरकरीता सदर इमारतीतील जागेचे रितसर वाटप झालेले आहे, यांची पडताळणी करुनच काम सुरु करण्यात यावे.

(२) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त ६ महिन्यात पूर्ण होईल, याबाबत संबधित कार्यकारी अभियंता (बां) जि.प. यांनी नियोजन करावे व पूर्णत्वाचा दाखला शासनास सादर करावा.

(३) कार्यालयीन इमारतीचे नूतनीकरण व दुरुस्तीचे काम शासनाच्या प्रचलीत मार्गदर्शक तत्वाप्रमाणे करण्यात यावे. तसेच खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर करावी.

(४) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीत काम पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी.

(५) या नुतनीकरण व दुरुस्तीचा खर्च प्रधान मंत्री ग्राम सडक योजनेच्या प्रशासकीय निधीतून भागविण्यात यावा.

२. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. 201109261538460001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(वॉल्टर डिमेलो)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत -

१) मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
२) उप सचिव (प्रमंग्रासयो) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
३) श्री. सुनिल मोने (वित्तीय नियंत्रक ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
४) अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो)(पुणे विभाग) ठाणे
५) कार्यकारी अभियंता ,( प्रमंग्रासयो), ठाणे
६) कक्ष अधिकारी /योजना-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
७) निवड नस्ती.